अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्क मान्यता)
अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार

# वन कार्ययोजना आराखडा

सामुहिक वनहक्काचे संरक्षण व व्यवस्थापन योजना

## ग्रामसभा- राजोली

कालावधी

(सन 2022-23 ते 2031-32)



तालुका - धानोरा

जिल्हा गडचिरोली

# ठराव

**ग्रामसभेचे नाव:** राजोली
**ग्राम पंचायतीचे नाव:** नवरगाव
**तालुक्याचे नाव:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**दिनांक:**



**ठराव:**
**क.)** असे घोषित करण्यात येते की, यासोबत जोडले
सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून. 10 वर्षे या कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.
**ख. )** असेही घोषित करण्यात येते की, सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा (Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल
**i)** सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा / सूक्ष्म आराखडा / चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.
**ii)** वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा / चालू आराखडा / सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.
**ग.)** सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.
**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की, ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म / चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.
**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की, कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन, वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाही.



## 1. आमच्या गावाविषयी

### 1.1. प्रस्तावना

इंग्रजांच्या वसाहत काळात तसेच स्वातंत्र्यानंतर वनांच्या एकत्रीकरणात आदिवासी व वनात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या जन समुहावर झालेला ऐतिहासिक अन्याय दूर करण्यासाठी करण्यात आलेला भारत सरकारचा कायदा "अनुसुचित जमाती व इतर पंरपंरागत वननिवासी ( वन ह्क्क मान्य करणे) अधिनीयम 2006 नियम 2008 व सुधारित नियम 2012" नुसार कलम 3(1) नूसार सामुहिक वन हक्क मिळण्याचे अधिकार प्राप्त झाले. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना सामुहिक वन हक्कांतर्गत निस्तार सारखे हक्क, गावाचे सिमेंतर्गत किंवा सिमेबाहेर पारंपारिकरित्या गोळा केले जाणारे वन उत्पादन, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क, पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविणेइत्यादी हक्क आहेत.

अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम 2006 अस्तित्वात आल्यानंतर अनुसुचित जमाती व अन्य पारंपारिक वननिवासी (वन हक्काची मान्यता)नियम 2008 व सुधारित नियम 2012 तयार करण्यात आले.सुधारित नियम 2012 चे नियम 4(1)(च) नुसार अनुसुचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासीं यांच्या फायद्यासाठी अश्या सामुहिक वन संसाधनाचे शाश्वत व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामुहिक वन संपत्तीचे संवर्धन करण्याची व तीचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या वन विभागाच्या सूक्ष्मदर्शक आराखडा किंवा कार्यआयोजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर संवर्धन व व्यवस्थापन योजना समितीला करणे आवश्यक वाटेल अश्या फेरबदलाविषयी एकत्रीकरण करणाऱ्या खंड (ङ) नुसार गठीत करण्यात आलेल्या समितीचे संनियंत्रक व नियंत्रण करणे अशी जबाबदारी ग्रामसभाना देण्यात आली. कायद्यातील नियम 4(1)(च) च्या तरतूदीनुसार कर्तव्ये पार पाडण्यासाठी ग्रामसभा तिच्या सदस्यामधून नियम 4(1)(ङ) नुसार स्थापन केलेल्या समितीला "सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समिती" (Community Forest Rights Management Committee)असे संबोधण्यात यावे. सदर समितीचे संनियंत्रन व नियंत्रन ग्रामसभा करेल. ग्रामसभेतील सामूहिक वन संपत्तीचे संवर्धन व व्यवस्थापन योजना तयार करणे, नैसर्गिक साधन संपत्तीच्या व्यवस्थापनातून प्राप्त होणारा महसुल तसेच शासनाकडुन प्राप्त होणारा निधी यांचे बँक खात्यामार्फत संनियंत्रण करणे, जमाखर्चाचे लेखे व लेखापरिक्षण ठेवणे इत्यादी प्रशाकीय बाबी पार पाडण्याकरीता सदर समिती ही वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीसाठी ग्रामसभेची कार्यकारी समिती असेल.त्यामुळे सामुहिक वन हक्कांतर्गत प्राप्त क्षेत्राचा आराखडा तयार करणेची जबाबदारी ग्रामसभा व ग्रामसभाद्वारे नियुक्त सामुहिक वन हक्क व्यवस्थापन समितीस या कायद्याने देण्यात आली आहे.त्यानुसार आराखडा तयार करण्यात आला आहे.

## 1.2 पार्श्वभूमी

वनहक्क कायदा 2006 मुळे ज्या गावांना वनहक्क मिळाले आहेत त्या वनांचे संवर्धन व व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कायद्याने ग्रामसभेवर आलेली आहे.
मुख्य म्हणजे सरकारने विविध कायदे अमलात आणले आहेत,त्यामध्ये वनहक्क कायदा,पेसा कायदा, जैवविविधता कायदा या सर्व कायद्याच्या आधारे आदिवासी व इतर पारंपरिक वननिवासी यांना वनांचे सरंक्षण व संवर्धन करणे सोयीचे झाले आहे. वनहक्कामुळे मिळालेले क्षेत्र संरक्षण व संवर्धन करून शाश्वत पध्दतीने टिकविणे ही आपली जबाबदारी व कर्तव्य आहे. आणि तस करण्यासाठी कायद्यात तरतूद पण आहे, हे सर्व संरक्षण व संवर्धन करण्यासाठी ची जी प्रक्रिया करायची आहे त्यासाठी जो नियोजन करायचं आहे त्यालाच 'कार्ययोजना' असे म्हणतात.
ही कार्ययोजना बनविण्यामागचे मुख्य उद्देश म्हणजे स्थानिक जनतेचे जीवनमान सुधारणे ,माणसांच्या सर्व गुणांचा विकास,वनांचा टिकाऊ पद्धतीने वापर करणे,जैवविविधता एकत्रित सांभाळणे व जोपासणे,मातीची धूप थांबविणे.
सुरुवातीपासून वनविभाग जी कार्ययोजना बनवत आले आहेत, ती ग्रामसभेच्या समजीच्या बाहेर आहे ,त्यांच्या कार्ययोजनेत अधिक स्पष्टता दिसत नाही ,अतिशय कमी उपयोगाची कार्ययोजना अस म्हणता येईल , मुख्य म्हणजे गावातील लोकांचा सहभाग घेऊन किंवा वनातील प्रत्येक बाबीचा अभ्यास करून ती बनविल्या जाते असे म्हणणे चुकीचे ठरेल.ग्रामसभेनी बनविलेली कार्ययोजना वनविभागाला वापरणे कायद्याने बंधनकारक असेल.
वनहक्क प्राप्त ग्रामसभा जी कार्ययोजना बनवेल,ती वनविभाकडे देईल,वनविभाग स्वतःची कार्ययोजना न वापरता ग्रामसभेने बनवून दिलेली कार्ययोजना वापरेल.आणि आपण बनवून दिलेली कार्ययोजना कायद्याच्या दृष्टीने चांगली आहे.ग्रामसभा जी कार्ययोजना बनवेल त्यामध्ये हक्क मिळालेल्या अधिकार क्षेत्रात असलेली वनसंपती, जल,जमीन,यांची आजपर्यंतची माहिती व संख्येचा अंदाज असेल व याचा

फायदा भविष्यात ह्या वनसंपतीचे संरक्षण,संवर्धन व शाश्वत वापरासाठी जो नियोजन करायचं आहे त्यासाठी उपयोगी येईल.
जस की टापूची यादी,भदृश्य प्रकार ,भूरचना,वनस्पती चा अंदाज ,वनस्पतीचा उपयोग,दुर्मिळ वनस्पती,जलसाठ्यांचा अभ्यास इत्यादी महत्वाची माहिती गोळा करून ती कार्ययोजना बनविण्यात येईल.व यामुळे भविष्यात ह्या वनसंपतीचे संरक्षण ,संवर्धन व शाश्वत वापरासाठी करावयाचे व्यवस्थापन व नियोजन चांगल्या रीतीने करता येईल.आणि निश्चितच अशा कार्ययोजनेमुळे वनांचा संरक्षण व संवर्धन योग्य रीतीने होऊन त्या वनांची वृद्धी होईल.

**आमची ग्रामसभा**
**ग्रामसभेचे नाव:-** राजोली
**ग्रामपंचायत:** नवरगाव
**तालुका:** धानोरा
**जिल्हा:** गडचिरोली
**सेन्सस कोड:** 538982
**अ.अक्षांश** : 20.25224N
**ब. रेखांश** : 80.262841E
**जोडपत्र दिनांक:** 06/05/2013



**वनाधिकार अभिलेख (जोडपत्र)**

| हक्क | होय/नाही | शेरा |
|---|---|---|
| 1) निस्तार हक्क | होय | निस्तार पत्रका प्रमाणे मान्य |
| 2) गौण वनोत्पादनावरील हक्क | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (ग) प्रमाणे मान्य |
| 3) अन्य सामूहिक हक्क जसे- अ) वापर किंवा हक्कदारी असलेले (जल)<br>ब) चराई ( जंगल) | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (घ) प्रमाणे मान्य |
| 4) जैविक विविधता, बौद्धिक संपत्ती व पारंपरिक ज्ञान यांच्या हक्कांची सुगमता. | होय | जैवविविधता कायद्यानुसार गठीत ग्रामस्तरीय समितीला हक्क |
| 5) अन्य पारंपरिक हक्क. | होय | अधिनियमाचे कलम 3 (1) (झ) प्रमाणे मान्य |

## 1.3 इतिहास

राजोली गावाचा इतिहास..

प्रस्तावना :

राजोली हे गाव स्वातंत्र्यापूर्वीपासूनच याच ठिकाणी वास्तव्यास आहे.राजोली हे गाव धानोरा ते गडचिरोली मार्गावरून पश्चिम दिशेला 2 किमी अंतरावर आहे. गावाच्या आजूबाजूला डोंगर ,नद्या व जंगलांनी वेढलेला आहे.

सुरुवातीला राजोली या गावात मालगुजारी होती ती मालगुजारी जैतूंबाई नावाच्या एका स्त्री कडे होती ,ती मूळची कामठी (नागपूर)येथील रहिवासी होती,अस म्हणतात की ती जेव्हा इकडे दोऱ्या वर यायची तर तिच्यासाठी मुक्कामाची सोय म्हणून एक घर पण बांधलेला होता.मालगुजरीच्या काळात गावातील लोक जे काही उत्पन्न घ्यायचे त्याच्यावर त्या जैतूंबाईचा हिस्सा असायचा .त्यानंतर जमीनदारी आली त्यामध्ये 32 गावाचा एक जमीनदार असायचा व तो सम्पूर्ण गावावर लक्ष ठेवायचा. अस म्हणतात की सर्व कारभार त्याच्या आदेशाने चालायचं ,कालांतराने जमीनदारी संपुष्टात आली व लोक स्वतंत्र जीवन जगू लागले.

राहणीमान व उदरनिर्वाह:

सुरुवातीला राजोली गावात 10 घरांची वस्ती होती त्यामध्ये चार कुळातील लोक राहायचे ,मुख्य म्हणजे माळी समाजाचे 6 घरे,आदिवासी समाजाचे 4 घरे,सुरुवातीला घर हे गवत मातीच्या कुळाचे असायचे, ,लोकांचं जीवन हे जल,जंगल,जमीन यावर अवलंबून होते.आमच्या गावात आधी जंगल खूप होत म्हणजेच आता जो अधिकार क्षेत्र भेटलेला आहे तेवढ्याच क्षेत्रात पण आताच्या तुलनेत आधी जंगलाची दाटी जास्त होती, शेतजमिनी कमी होत्या , त्यामुळे लोक शेतजमिनीवर अवलंबून न राहता जंगलातून मिळणाऱ्या वस्तूवर आपल्या पोटाची खळगी भरायचे जस की मोह ,टेम्बरून ,कंदमुळे इ. ते मोह वेचून आणले की त्याला वाळवायचे व चटणी सोबत पोट भरून खायचे, तसेच टेम्बरून चे फळ उन्हाळ्यात एक एक पोता भरेल एवढं आणायचे व त्याचे खुला टाकून(वाळवून)ठेवायचे व पावसाळ्यात खायचे.तसच कंदमूळ म्हणून कळूकांदा सर्वात जास्त खायचे. व या सोबतच अन्नाची सोय म्हणून जंगलात सामूहिक शिकारीला जायचे व जे काही शिकार आणायचे ते सर्वजण वाटा करून खायचे.त्या काळात जेवणासाठी तांब्याच्या ताट वापरत व स्वयंपाकासाठी व पाणी पिण्यासाठी मातीची भांडी वापरत,पिण्याच्या पाण्याची सोय म्हणून दोन विहिरी दगड रेचून खोदल्या होत्या त्या विहिरी आजही जिवंत आहेत.

वन व वन्यजीव:

सुरुवातीच्या काळात खूप दाट जंगल होत. जंगलात राहणारे प्राणी पण खूप होते. वाघ,रानडुक्कर,हरीण,सांबर,बिबटया, ससा,घोडेनिल,अस्वल इत्यादि प्राणी व तसेच विविध प्रकारचे पक्षी असायचे, गावाला लागूनच जंगल असल्यामुळे वन्य प्राणी गावाच्या आसपास फिरत असत, पण एकही प्राण्याने माणसाला कोणतीही हानी पोहचवली नाही, अस म्हणतात की त्या काळात कावळा(कावळे )हा पक्षी आमच्या गावी खूप असायचा ,म्हणजे दिवसभर आसपासच्या गावात फिरून राजोली गावात आपला ठिय्या मांडायचे.

आधी जंगलात वणवा नाही लागायचा व कुणी लावायचे पण नाही ,त्यामुळे प्रत्येक वनस्पती वाढायची,मोहाच्या झाडाला देवाचा दर्जा दिला जायचं,जे आजही आहे. आरोग्याची सोय म्हणून प्रत्येक बिमारीवर औषधी वनस्पती वापरण्यात यायची पूर्वीपासून गावात वैदू लोक राहतात तेच उपचार करायचे

व आजही काही वैदू लोक उपचार करत आहेत.
अशारितीने समोर काळ बदलत गेला व 6 मे 2013 ला वनहक्क मिळाला ,तेव्हापासून वन अधिकाराची जाणं ठेवून व कायद्याला सोबत घेऊन शाश्वत पद्धतीने वापर करत जंगलाचा संरक्षण व संवर्धन करणे सुरू आहे, व सोबतच गाव विकासाच्या दिशेने वाटचाल करत आहे.

## 1.4 गावाची प्राथमिक माहिती

| | |
|---|---|
| **गावाचे नाव** | राजोली |
| **ग्रामपंचायत** | नवरगाव |
| **तालुका** | धानोरा |
| **जिल्हा** | गडचिरोली |
| **गावातील कुटुंबाची संख्या- 162** | अनुसूचित जाती(SC)- 2 |
| | अनुसूचित जमाती(ST)- 16 |
| | इतर- 144 |
| | |
| | |
| **पुरुष लोकसंख्या** | 360 |
| **स्त्री लोकसंख्या** | 340 |
| **एकूण लोकसंख्या** | 700 |
| **अनुसूचित जाती लोकसंख्या** | 79 |
| **किती टोले आहेत (नावे लिहा)** | |



## 1.5 गावाची भौगोलिक माहिती

| **अ. क्र.** | **खात्याचे प्रकार** | **क्षेत्र हे.** |
|---|---|---|
| 1 | वन | 310 |
| 2 | झुडपी जंगल | 0 |
| 3 | आखर | 1 |
| 4 | गावठाण | 7 |
| 5 | तलाव/बोडी | 4 |
| 6 | मसानवट | 1 |
| 7 | ढोरफोडी | 1 |
| 8 | पाट | 2 |
| 9 | खातखुड्या | 0 |
| 10 | रस्ते | 2 |
| 11 | नदी/नाले | 6 |

| | | |
|---|---|---|
| 12 | पोटखराब | 0 |
| | **एकूणक्षेत्र** | **334** |
| **अ. क्र.** | **खात्याचे प्रकार** | **क्षेत्र हे.** |
| 1 | बागायत | 0 |
| 2 | जिरायत | 310 |
| | **एकूण** | **310** |



## 1.6 गावाची व्यवसाया संबंधी माहिती

| व्यवसाय | कुटुंबाची संख्या |
|---|---|
| शेती | 161 |
| पशुधन | 162 |
| दुधाचा व्यवसाय | 0 |
| वनउपज गोळा करणारी कुटुंब | 162 |

## 1.7 पोलो – निसर्गाशी संबंधित सन

| नाव | वेळ | निसर्ग संपदा |
|---|---|---|

| | | |
|---|---|---|
| आकाडी पोलो | जून महिन्यात | जंगलातून मिळणाऱ्या ज्या रानभाज्या आहेत,उदा.वरम्बी, शेरडीरा इ. हे खण्याकरिता आणण्याच्या आधी ही पोलो केली जाते, या पोलो नंतरच गावातील लोक रानभाज्या आणतात. |
| हाळोक पोलो | रोवणे झाल्याचा नंतर सप्टेंबर महिन्यात | रोवणे झाल्यावर सगळे काम ठप्प पडलेले असतात, त्यामुळे आर्थिक स्थिती कोलमडलेली असते, तर या स्थितीत आम्हाला सांभाळ अशी निसर्ग देवतेला विनवणी केली जाते. व आमचा हाळोकाचा काळ चांगला जाओ म्हणून या दिवशी गावातील लोक ,जंगलात पूजा करून सर्व मिळून जेवण करतात. |
| अडी पोलो | रोवणी झाल्यावर धान परिपक्व होईपर्यंत | रोवणी झाल्यापासून ते धान परिपकव होईपर्यंत ही पोलो पाळली जाते, ही पोलो दर शनिवारी पाळतात, भिमानखोजी येथील पाणी आणून सम्पूर्ण धानशेतीच्या जागेवर शिंपण केले जाते.अस केल्याने धानावर अळी लागत नाही असा समज आहे. |
| संजोरी | धान कापणी,बांधणी झाल्यावर,डिसेंबर महिन्यात | धानाचा उत्पन्न चांगला झाला पाहिजे म्हणून धान मळणी च्या आधी ही संजोरी पोलो केली जाते.गाववस्तीच्या बाहेर जाऊन गावातील सर्व पुरूष लोक एकत्र जमा होऊन ,बकरा मटण जेवण करतात. |
| बिजोर पोलो | पावसाळ्यात बी पेरणीच्या आधी,पारंपरिक पद्धतीनुसार ही पोलो केली जाते | एक माऊलीचा मंदिर आहे ,त्या मंदिरात पूजा करतात,धानाचे बीज माऊली समोर ठेवल्या जाते, बीज चांगली उत्पन्न झाली पाहिजे यासाठी हे पोलो करतात. |

## गावातील सामुहिक देवस्थान

| अ.क्र. | नाव | स्थान |
|---|---|---|
| 1 | नार माता/ गाव माउली/ माराई | गावात |
| 2 | महादेव | जंगलात |
| 3 | भीम देव | जंगलात |
| 4 | बजरंग बली | गावात |

## 1.8 संघटन

गावामध्ये कोणतेही सामूहिक काम करायचे असल्यास त्यासाठी एखादी संघटना किंवा समिती असणे आवश्यक आहे. अन्यथा तो काम कधीच चांगला होत नाही कारण त्या कामावर कुणाचीही लक्ष राहत नाही.त्यामुळे गावामध्ये सुद्धा असे काही समित्या स्थापन करणे आवश्यक असते.

1) वनहक्क समिती
2) सनियंत्रण समिती
3) जैवविविधता समिती
4) बँकेच्या व्यवहारासाठी समिती
5) वेगवेगळे पास देण्यासाठी समिती
6) तंटामुक्त समिती
7) लेखापाल
यासाठी योग्य व्यक्ती आणि गरजेनुसार समिती तयार करणे आवश्यक आहे.

## 1.9 इतर ग्रामसभा व महासंघाशी संबंध

1) तालुका महासंघाचा कार्यालय तालुक्याची ठिकाणी असून प्रत्येक ग्रामसभेचा अध्यक्ष हा तिथला सदस्य आहे.
2) तालुका महासंघातील समाविष्ट असलेल्या ग्रामसभांची महीन्यातून एक सभा घेतली जाते.
3) सभेतील विषयावर चर्चा करून बहुमत्ताने निर्णय घेतला जातो.
4) महासंघाने ठरविल्याशिवाय कोणतेही ग्रामसभाची
तेंदूपत्ता किंवा इतर कोणत्याही कामाचा किंवा वस्तूचा लिलाव केले जात नाही.
5) महासंघ सम्बधित ठेकेदारासोबत करार करून योग्य तो दर मिळेल यासाठी प्रयत्न करतो.
6) प्रत्येक बाबतीत महासंघ ग्रामसभेला मदत करायला तयार असतो.
7) कमकुवत ग्रामसभांना अधिकारांची जाणं करून देऊन त्यांना सक्षम बनविण्यात महासंघ सहकार्य करतो.
8) तसेच इतर ग्रामसभा सुध्दा सहकार्य करत असतात.
एखाद्या गावाला काही अडचण किंवा फसवणूक झाल्यास ते आधी आपल्या जवळच्या ग्रामसभाशी चर्चा करून नंतर महासंघमध्ये विषय मांडतात.

## 1.10 गावात असलेल्या सुविधा

गावातील सेवा, सुविधा आणि त्यांचे अंतर खालील प्रमाणे आहे–

| अ.क्र. | सुविधा व यंत्र संसाधन | हो/ नाही | अंतर |
|---|---|---|---|
| 1 | प्राथमिक शाळा | हो | गावात |
| 2 | अंगणवाडी | हो | गावात |
| 3 | गट ग्रामपंचायत कार्यालय | हो | 4 किमी |
| 4 | आरोग्य उपकेंद्र | हो | गावात |
| 5 | तलाठी कार्यालय | नाही | 6 किमी |
| 6 | स्वस्त धान्य दुकान | हो | गावात |
| | पोष्ट ऑफिस | | 6 किमी |
| | तालुका | | 7 किमी |
| | जिल्हा | | 38 किमी |

## 1.11 पशुधन माहिती

| अ.क्र. | पशुधनाचे प्रकार | संख्या |
|---|---|---|
| 1 | गाय- बैल | 380 |
| 2 | म्हैस- रेडे | 2 |
| 3 | शेळी/बकरे | 180 |
| 4 | कोंबडी | 400 |
| 5 | डुक्कर | |

### 1.12 कृषी पिके हंगाम माहिती

| अ.क्र. | हंगाम | खरीप (हो/नाही) | रब्बी (हो/नाही) |
|---|---|---|---|
| 1 | धान | हो | हो |
| 2 | भाजीपाला | नाही | हो |
| 3 | तूर | नाही | हो |
| 4 | चना | नाही | हो |
| 5 | मुंग | नाही | हो |
| 6 | जवस | नाही | हो |
| 7 | उळीद | नाही | हो |
| 9 | शेंगदाणे | नाही | हो |

### 1.13 पावसाची सरासरी

| वर्ष | पाऊस (मी.मी.) |
|---|---|
| 2015 | 848 |
| 2014 | 1266 |
| 2013 | 2368 |
| 2012 | 1568 |
| 2011 | 1214 |
| 2010 | 1769 |
| 2009 | 1124 |
| 2008 | 1272 |
| 2007 | 1874 |
| 2006 | 1564 |
| 2005 | 1682 |
| 2004 | 1315 |



## 2. वन व्यवस्थापन आराखड्याविषयी

### 2.1 उद्देश आणि कृती

| उद्देश | कृती |
|---|---|
| 1) वनाचे संरक्षण करणे:- | 1. वनाचे वनव्यापासुन ऱ्हास थांबवणे.<br>2. निसर्गातून मिळणाऱ्या विविध लाभांना, गौण उपजांना वाढविणे व टिकवून ठेवणे<br>3.आपल्या जंगलातून चोरी होणाऱ्या मालाला रोख लावणे व दंडात्मक कार्यवाही करणे. |

| | |
|---|---|
| | 4.जंगल सौरक्षण साठी गावात नियमावली तयार करणे.<br>5.सीमांकन करणे.<br>6.रोपवाटिका तयार करणे.<br>7.औषधी वनस्पती व चराई साठी चारा तयार करणे.<br>8.वनस्पतींची यादी बनवणे.<br>9.वेगवेगळ्या भुदृश्यांची यादी बनवणे.<br>10.जंगलाचे शाश्वत पद्धतीने वापर करणे.<br>11.वेगवेगळ्या भुदृश्यांची नकाशे तयार करणे.<br>12वनस्पती लागवडी नंतर त्यांची निघा राखणे.<br>13.वृक्षांची दर हेक्टरी संख्येचा अंदाज काढणे. |
| 2) जंगलातील जैवविविधतेचे संरक्षण :- | 1) आपल्या जंगलातील जैवविविधतेचे नुकसान होत असल्यास त्यासाठी कृतिशील असणे.उदा. शिकार, अवैध मासेमारी असे अवैध काम होत असल्यास त्यास प्रतिबंध घालणे.<br>2) नष्ट होणाऱ्या वनस्पतींची कारणासहित नोंद ठेवणे |
| 3) स्थलांतर थांबवणे | 1) गावातील तरुण मुलं गावात काम नाही मिळत म्हणून बाहेर कंपनीमध्ये जातात परंतु ठेकेदाराकडून त्यांची फसवणूक होऊन वापस गावात येतात असे प्रकरण थांबविणे. तसेच<br>2) गावातील लोकांना बाहेर रोजगारासाठी जाण्याची वेळ येऊ नये यासाठी गावातच वर्षभर काम पुरले पाहिजे यासाठी वेळोवेळी रोजगार हमी किंवा इतर योजनेच्या माध्यमातून काम उपलब्ध करून देणे. |
| 4) रोजगार हमी योजना ग्रामसभा स्वतः राबवेल यासाठी प्रयत्न करणे. | वनहक्क च्या कलम ३(१)(e) नुसार रोजगार हमी यंत्रणा घोषित करणे. |
| 5) ग्रामसभेची फसवणूक टाळणे | 1) गौण वणोपजाची खरेदी ग्रामसभेतच करणे व ग्रामसभेतर्फे त्याची विक्री करणे.<br>2) गौण उपजांची मूल्यसंवर्धन व विक्री साखळी तयार करणे.<br>3) तेंदु व बांबू प्रक्रिया स्वतः ग्रामसभे मार्फत करणे.<br>4) गावात नियम तयार करणे,उदा,(ग्रामसभेचे , जंगलाचे, गौणउपज वापराचे, आर्थिक व्यवहार, निस्तार काढण्याचे ,इत्यादी) |

## 2.2 सामुहिक वनसंपत्ती क्षेत्राचा तपशील

### गावाच्या गावहद्दी येणाऱ्या वनक्षेत्राची माहिती खालील प्रमाणे-

**A) कंपार्टमेंट नंबर तपशील :- 513,514**

**B) सर्व्हे नंबर तपशील :- 16, 25, 31, 32, 38, 41, 44, 65, 76, 77, 78, 80, 84, 86, 95, 110, 114, 137, 138, 141, 145, 173, 175, 186, 187**

**C) वनक्षेत्राच्या चतु:सीमा ची माहिती -**

**पूर्व**- लेखा, मेंढा सीमा 518. **उत्तर–** सोडे सीमा ,516.
**पश्चिम-** येरंडी सीमा 515. **दक्षिण-** काकडयेली, 466.

## 2.3 सीमा व हद्दीची स्थिती

1.सीमा हद्दीवर जाळ रेषा आखलेली आहे. 2.सीमा हद्दीबाबत सीमेलगत गावाशी कोणत्याही प्रकारचा वाद नाही. 3.सीमा हद्दीवर थोड्या थोडया अंतराने दगडी मुणारे उभारलेले आहेत. 4.काही ठिकाणी एका लाईनमध्ये दगड रेचलेले आहेत. 5.सीमा रेषा साफ केलेली आहे. 6.पूर्वेपासून दक्षिण सीमेलगत जवळपास 1किमी अंतर कठानी नदी वाहते.

## 2.4 समुदायीक वन हक्क प्राप्त जंगलावरील सद्यस्थितीतील अडचणी व धोके

1) **आंतरिक धोके** :- वणवा, वृक्षतोड, अतिक्रमण,बिमारी, हवामान बदल
2) **बाह्य धोके**:- वणवा, वृक्षतोड,चोरी,

## 2.5 जमिनीचा वापर तक्ता:

| जमिनीचा वापर | क्षेत्रफळ (हे) |
|---|---|
| शेतजमीन | 132 |
| गावठाण | 7 |
| पडीत | 28 |
| शासकीय जमीन | 31 |
| वनजमीन | 372 |

## 2.6 भूभाग / जलभाग यादी

| तुकडा क्रमांक | भुदृश्य प्रकार | भूरचना |
|---|---|---|
| 10 | १७. खूप कमी वृक्ष डोंगराळ (बांबू) | कमी चढ |
| 9 | ९. मध्यम वृक्ष डोंगराळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 8 | १०. दाट वृक्ष डोंगराळ (मिश्र) | उंचसखल |
| 7 | ५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 6 | ८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र) | मध्यम चढ |
| 5 | ११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र) | कमी चढ |
| 4 | ७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र) | मध्यम चढ |
| 3 | ४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र) | मध्यम चढ |
| 2 | ३० शेती | सपाट |
| 1 | १. खूप कमी वृक्ष मैदानी (मिश्र) | कमी चढ |

## 2.7 ग्रामसभेद्वारा सीमांकन केलेला नकाशा – परिशिष्ठ 1

## 2.8 वनक्षेत्रातील टापू (पारंपारिक/विशिष्ट नावाने ओळखल्या जाणारी जागा) माहिती

1.बिजाऊ खाई, 2.पाण्याचा झोरा, 3.भटाळ, 4.गिट्टी खदान, 5.वांडरूमाऱ्या झोरा, 6.फुटका बांध, 7.ढिवर दंड, 8.फुटका तळ, 9.येरंडी पहाडी, 10.कोलप, 11.ताडाचा टेकर.

## 2.9 वृक्षांचा विविध भूभागावर संख्यात्मक अंदाज

| | | | |
|---|---|---|---|
| **भुदृश्य प्रकार** | **११. दाट वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | Bahava | 42.3028621 | 0.681686847 |
| 2 | Bhehra | 84.6057241 | 4.283686485 |
| 3 | Dhavadi | 126.908586 | 14.60997984 |
| 4 | Garadi | 126.908586 | 0.695152266 |
| 5 | Moha | 42.3028621 | 5.259929377 |
| 6 | Sag | 42.3028621 | 1.55660246 |
| 7 | Salai | 84.6057241 | 3.212849022 |
| 8 | Shehna | 126.908586 | 0.381071364 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **676.8457928** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **४. विरळ वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | Bahava | 42.3028621 | 0.681686847 |
| 2 | Bhehra | 84.6057241 | 4.283686485 |
| 3 | Dhavadi | 126.908586 | 14.60997984 |
| 4 | Garadi | 126.908586 | 0.695152266 |
| 5 | Moha | 42.3028621 | 5.259929377 |
| 6 | Sag | 42.3028621 | 1.55660246 |
| 7 | Salai | 84.6057241 | 3.212849022 |
| 8 | Shehna | 126.908586 | 0.381071364 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **676.8457928** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **५.विरळ वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | Bhehra | 48.8735519 | 0.395405425 |

| | | | |
|---|---|---|---|
| 2 | Biba | 5.43039466 | 0.145370912 |
| 3 | Bija | 48.8735519 | 2.727001019 |
| 4 | Char | 10.8607893 | 0.059807771 |
| 5 | Dhavadi | 27.1519733 | 0.758141287 |
| 6 | Dhavdi | 5.43039466 | 0.033879547 |
| 7 | Garadi | 70.5951305 | 0.369520414 |
| 8 | Kidmudi | 5.43039466 | 0.044250837 |
| 9 | Kojab | 5.43039466 | 0.038892337 |
| 10 | Kuda | 5.43039466 | 0.027008567 |
| 11 | Kudkudi | 5.43039466 | 0.029212466 |
| 12 | Moh | 43.4431572 | 2.804094274 |
| 13 | Moha | 43.4431572 | 1.09793067 |
| 14 | Movai | 5.43039466 | 0.014001241 |
| 15 | Rohan | 21.7215786 | 0.185386806 |
| 16 | Sag | 10.8607893 | 0.387583744 |
| 17 | Salai | 5.43039466 | 0.087507758 |
| 18 | Savrun | 5.43039466 | 0.052936792 |
| 19 | Shehna | 27.1519733 | 0.181454358 |
| 20 | Tendu | 16.291184 | 0.124109768 |
| 21 | Yen | 38.0127626 | 0.57227913 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **456.1531511** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **७. मध्यम वृक्ष मैदानी (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | Aavda | 5.89483847 | 0.067737512 |
| 2 | Bhehra | 94.3174155 | 1.096371967 |
| 3 | Bija | 100.212254 | 4.256580195 |
| 4 | Char | 11.7896769 | 0.058637043 |
| 5 | Charoli | 5.89483847 | 0.057464302 |
| 6 | Dhavadi | 35.3690308 | 0.992748586 |
| 7 | Dhavdi | 5.89483847 | 0.067737512 |
| 8 | Garadi | 29.4741924 | 0.227324087 |
| 9 | Kudmudi | 11.7896769 | 0.145607504 |
| 10 | Moh | 47.1587078 | 2.489400461 |
| 11 | Moha | 53.0535462 | 1.796545165 |
| 12 | Movai | 5.89483847 | 0.854928081 |
| 13 | Rohan | 11.7896769 | 0.094992009 |
| 14 | Sag | 17.6845154 | 0.710634046 |
| 15 | Salai | 5.89483847 | 0.075055415 |
| 16 | Shehna | 11.7896769 | 0.070739728 |
| 17 | Surya | 5.89483847 | 0.082748594 |
| 18 | Tendu | 35.3690308 | 0.970278871 |

| | | | |
|---|---|---|---|
| 19 | Yen | 23.5793539 | 0.124873446 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **501.06127** | |
| | | | |
| **भुदृश्य प्रकार** | **८. मध्यम वृक्ष खडकाळ (मिश्र)** | | |
| **क्र.** | **वृक्ष** | **वृक्ष संख्या प्रती हेक्टर** | **खोड क्षेत्रफळ प्रती हे (चौ.मी.)** |
| 1 | Aavda | 40.933195 | 0.399026619 |
| 2 | Bhehra | 368.398755 | 3.177554835 |
| 3 | Garadi | 81.86639 | 0.548865187 |
| 4 | Moha | 81.86639 | 0.692189034 |
| 5 | Surya | 122.799585 | 0.933233685 |
| 6 | Yen | 122.799585 | 1.182096002 |
| **वृक्ष संख्या** | **प्रती हेक्टर** | **818.6638996** | |



## 3. वनहक्क अंतर्गत मिळणाऱ्या लाभांची गरज आणि वापर तपशील -

### 3.1 वनस्पती वापर तपशील

### शीट 1 (अन्न)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण (%) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | कुळा | फुल,शेंगा | जून ते जुलै | 70 | 75 | 25 |
| 2 | पिंपळ बार | फुल | जून ते जुलै | 30 | 75 | 25 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 3 | सफेद मुसळी | पान | जुलै अगस्त | 40 | 99 | 1 |
| 4 | कळू कांदे | कांदे | डिसेंबर ते जानेवारी | 26 | 99 | 1 |
| 5 | तरोटा | पान | जुलै | 34 | 25 | 75 |
| 6 | कडू भाजी | पान | मे ते जून | 32 | 99 | 1 |
| 7 | चिपळी भाजी | पान | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 3 | 99 | 1 |
| 8 | शेरडीरा | देठ | जुलै ते ऑगष्ट | 8 | 99 | 1 |
| 9 | बोराभाजी | पान | जुलै ते ऑगष्ट | 76 | 99 | 1 |
| 10 | आंबा | फळ | मे ते जून | 98 | 25 | 75 |
| 11 | आवळा | फळ | जानेवारी ते एप्रिल | 51 | 99 | 1 |
| 12 | उमरून | फळ | मे ते जून | 12 | 25 | 75 |
| 13 | कचर कांदे | कांदे | एप्रिल ते मे | 11 | 99 | 1 |
| 14 | काटा कोहळा | फळ | नोव्हेंबर ते जानेवारी | 12 | 1 | 99 |
| 15 | काळी मुसळी | पान | जुलै ते ऑगष्ट | 8 | 99 | 1 |
| 16 | कोयार भाजी | पान | जून | 91 | 99 | 1 |
| 17 | चिंच | फळ | मे ते जून | 80 | 25 | 75 |
| 18 | बोदेले | फळ | ऑक्टोंबर ते नोव्हेंबर | 80 | 70 | 30 |
| 19 | जांभूळ | फळ | जून ते जुलै | 80 | 70 | 30 |
| 20 | टेंभरून | फळ | एप्रिल ते मे | 90 | 99 | 1 |
| 21 | धोबे | पान | ऑगष्ट ते सप्टेंबर | 80 | 1 | 99 |
| 22 | पातुर भाजी | पान | जून ते जुलै | 80 | 99 | 1 |
| 23 | बेहळा | फळ | डिसेंबर ते जानेवारी | 17 | 99 | 1 |
| 24 | मटारु | फळ,कांदे | नोव्हेंबर ते डिसेंबर | 98 | 1 | 99 |
| 25 | गुंजा | पान | डिसेंबर | 22 | 99 | 1 |
| 26 | सुरुंद कांदे | कांदे | नोव्हेंबर ते मे | 98 | 98 | 2 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 27 | वर | दांडी | जुलै ते ऑगष्ट | 86 | 99 | 1 |
| 28 | सेलवट | फळ | मार्च | 25 | 90 | 10 |
| 29 | अरकफरी | कोवळे पान | एप्रिल | 67 | 99 | 1 |

## 3.2 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 2 (चारा)

| क्र. | वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी वापर केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बरटूम | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 2 | पुतेर जाळी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 3 | जुनाक जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 4 | हिकुम जप्पी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 5 | पर्सेला | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 6 | बिलायकोजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 7 | दुधूम | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 8 | बोराभाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 9 | कोरहुची | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 10 | उतरण वेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 11 | कसई | पान | जून ते मार्च | 90 | 10 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 12 | काटा भाजी | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 13 | कुसार्या गवत | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 14 | खोबरवेल | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 15 | गराडी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 16 | चिंच | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 17 | चिकना | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 18 | जंगली तूर | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 19 | जंगली मुंग | पान | ऑगष्ट ते डिसेंबर | 90 | 10 |
| 20 | जवेला | पान | जुलै ते ऑगष्ट | 90 | 10 |
| 21 | जांभूळ | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 22 | झिल्बुली | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 23 | डोर्ली वांगा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 24 | दुर्वा | पान | जून ते मार्च | 90 | 10 |
| 25 | बोंगा भाजी | पान | जून ते मार्च | 90 | 10 |



## 3.3 वनस्पती वापर तपशील

### शीट 3 (जाळाऊ लाकूड)

| क्र. | उत्पादन वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | रोहन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | झिलबुली | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | सिहाना | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | भेरा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | आवळा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 7 | चारा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 8 | पळस | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.4 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 4 (घर बांधणी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 2 | बांबू | ओला बांबू | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 3 | येन | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 4 | बिजा | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 5 | गराडी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |
| 6 | रोहणी | वाळलेला लाकूड | जानेवारी ते जून | 95 | 5 |

## 3.5 वनस्पती वापर तपशील

### पत्रक 5 (कृषी अवजारे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | साग | नांगर,दांडी | मे ते जून | 10 | 95 | 5 |
| 2 | बोरी | नांगर | मे ते जून | 3 | 95 | 5 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 3 | भेरा | नांगर,दांडी | मे ते जून | 25 | 95 | 5 |
| 4 | कोजूब | नांगर | मे ते जून | 36 | 95 | 5 |
| 5 | बिजा | नांगर, दांडी | मे ते जून | 5 | 95 | 5 |

## 3.6 वनस्पती वापर तपशील

## शीट 6 (कुंपण घालणे)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | बांबू | ओला/सुका बांबू | मे ते जून | 97 | 95 | 5 |
| 2 | साग | वाळलेला लाकूड | मे ते जून | 50 | 95 | 5 |
| 3 | गराडी | वाळलेला लाकूड | मे ते जून | 55 | 95 | 5 |
| 4 | येन | वाळलेला लाकूड | मे ते जून | 45 | 95 | 5 |
| 5 | बिजा | वाळलेला लाकूड | मे ते जून | 44 | 95 | 5 |
| 6 | पळस | वाळलेला लाकूड | मे ते जून | 67 | 95 | 5 |

## 3.7 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 7 (संस्कृती)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | कारण |
|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | |
| 1 | मोह | फांदी,पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 2 | बांबू | बांबू | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 3 | साग | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 4 | जांभूळ | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 5 | कोजूब | फांदी | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 6 | कुळा | पान,शेंग | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 7 | मोहई | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 8 | येन | वाळलेला लाकूड | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 9 | शतावरी | पान | ऑगष्ट | पोळा सणाच्या वेळी |
| 10 | बेल | पान | हमेशा | पूजेसाठी |
| 11 | तुळशी | पान | मार्च ते मे | लग्नासाठी |
| 12 | दुर्वा | पान | बाराही महिने | पूजेसाठी |
| 13 | पळस | पान | मार्च ते मे | पत्रावळी |
| 14 | कडूनिंब | पान | मार्च | पूजेसाठी |
| 15 | चिंच | फळ | बाराही महिने | आंबट टाकण्यासाठी |
| 16 | आंबा | पान,फळ | मार्च | नवा साठी व पूजेसाठी |
| 17 | करकरी | फुल | ऑगष्ट | पोळ्यासाठी |



## 3.8 वनस्पती वापर तपशील

## पत्रक 8 (वन औषधी)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| 1 | कटूल कोसा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 2 | दुधूम | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 3 | नयनेंडी | पंचांग | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 4 | तिरका | फळ | डिसेंबर ते मार्च | 95 | 5 |
| 5 | सिरेल | साल | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 6 | चंद्रीमरा | साल,मूळ | जून ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 7 | नाचुम | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 8 | कोरकोट जपी | पान,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 9 | बोराभाजी | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 10 | अडूळसा | पंचांग | जून ते नोव्हेंबर | 5 | 95 |
| 11 | झरका | पंचांग | जून ते जुलै | 95 | 5 |
| 12 | आघाडा | पंचांग | जून ते जानेवारी | 95 | 5 |
| 13 | अंजन | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 14 | आटइ | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 15 | आपटा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 16 | उरसुळी | पंचांग | जून ते मार्च | 50 | 50 |
| 17 | कचर कांदे | कांदा | नोव्हेंबर ते जून | 95 | 5 |
| 18 | कडूनिम | पंचांग | बाराही महिने | 50 | 50 |
| 19 | करकरी (पोरा पुंगार) | पंचांग | ऑगष्ट | 50 | 50 |
| 20 | रक्त रोहणी | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 21 | कुकुरडा | पंचांग | ऑगष्ट ते नोव्हेंबर | 95 | 5 |
| 22 | कुळा | पंचांग | बाराही महिने | 45 | 55 |
| 23 | कोयार भाजी | मूळ,पान | जून | 95 | 5 |
| 24 | करू | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 25 | खैर | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 26 | कोजूब | साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 27 | खोबरवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 28 | गराडी | साल,पान | बाराही महिने | 95 | 5 |
| 29 | गवती चाय | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 30 | गुळवेल | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 31 | माहूर | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 32 | मुंगना | पंचांग | बाराही महिने | 5 | 95 |
| 33 | सात्या | पंचांग | ऑगष्ट ते ऑक्टोंबर | 95 | 5 |
| 34 | रान केळी | पान,फळ | ऑगष्ट ते ऑक्टोंबर | 95 | 5 |
| 35 | रानझेंडू | फळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 36 | रानभेंडी | मूळ | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 37 | रिठा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 38 | रान हळद | कांदा | जून ते डिसेम्बर | 95 | 5 |
| 39 | रुई | पंचांग | बाराही महिने | 95 | 5 |
| 40 | रोहन | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 41 | लाजाळू | मूळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 42 | लालगुंजा | पंचांग | जून ते मार्च | 95 | 5 |
| 43 | लेन्जा | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 44 | लोगडी | फळ | बाराही महिने | 95 | 5 |
| 45 | वड | फळ,साल,मूळ | बाराही महिने | 95 | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 46 | वर | पंचांग | जुलै ते ऑगष्ट | 95 | 5 |
| 47 | वराकली | पंचांग | जानेवारी ते मार्च | 95 | 5 |
| 48 | वाघनकी | पंचांग | डिसेम्बर ते मे | 95 | 5 |
| 49 | शंखपुष्पी | पंचांग | बाराही महिने | 2 | 98 |
| 50 | सफेद मुसळी | पंचांग | जून ते सप्टेंबर | 95 | 5 |
| 51 | काळी मुसळी | पंचांग | जून ते सप्टेंबर | 95 | 5 |
| 52 | सावरून | साल | बाराही महिने | 95 | 5 |
| 53 | सुरुंद कांदे | कांदा | नोव्हेंबर ते मे | 98 | 2 |
| 54 | सेलवट | फळ | मार्च जून | 40 | 60 |
| 55 | हरदफरी | पान | फेब्रुवारी ते मार्च | 5 | 95 |

## 3.9 वनस्पती वापर तपशील

### पत्रक **9** (इतर)

| क्र. | उत्पादित वनउपज | | हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | वनस्पतीचे नाव | वनस्पतीचा भाग | | | समुदायीक क्षेत्रातून | इतर वन क्षेत्रातून |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

## 3.10 समुदायाने विक्रीसाठी जमा केलेल्या वनउपजचे विश्लेषण

| क्र. | वन उपजाचे नाव | वनउपज संग्रहाचे हंगाम आणि कालावधी | सहभागी कुटुंबांची संख्या | वनउपज विक्रीचे हंगाम आणि कालावधी | प्रति हंगाम सरासरी गोळा केलेले प्रमाण | वनउपजचे सरासरी बाजार किमत | मूल्यवृद्धी | विक्रीची जागा | समुदायीक क्षेत्रातून गोला केलेले प्रमाण | इतर वन क्षेत्रातून गोला केलेले प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | मोह | फेब्रुवारी ते मार्च | 162 | एप्रिल ते मे | ५ क्विंटल | २५ | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 2 | चार | एप्रिल | 100 | मे | २५ किलो | १९० | | फिरते व्यापारी | १००% | |
| 3 | तेंदू | मे | 162 | मे | १०० मुडके एक व्यक्ती | | | फिरते व्यापारी | ९०% | 10% |
| 4 | तरोटा | नोव्हेंबर ते डिसेम्बर | 40 | डिसेम्बर | 6 किलो | २५ | | फिरते व्यापारी | ७०% | ४०% |
| 5 | चिंच | मे | 3 | जून | 20 किलो | 35 | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 6 | टोरी | जून | 4 | जून | ४० किलो | २५ | | फिरते व्यापारी | ५०% | ५०% |
| 7 | बेहडा | जानेवारी ते मार्च | 5 | मार्च | ४० किलो | 7 | | फिरते व्यापारी | १००% | |

## 4. ग्रामसभा सक्षमीकरण

4. ग्रामसभा सक्षमीकरण

### 4.1 हक्क :- बंधने, कर्तव्य व नियमांचे पालन केल्यास खालील हक्क राहतील.

१) गौणउपज वापराचे
२) मत्स्य व्यवसाय करण्याचे
३) इमारत लाकूड वापरण्याचे
४) खनिज वापराचे
५) पाणीसाठे वापरण्याचे
६) संस्कृती जोपासण्याचे

### 4.2 नियम

**(A) जंगल गस्तीचे नियम :**

1) व्यक्तींच्या यादी नुसार गावातील एकूण घरांपैकी 3 घर मिळून तिघे जण गस्तीवर जातील.
2) तिघे जण तीन दिवस जातील. परंतु याच अर्थ एकटा जर एकच दिवस गेला तर होईल असे समजू नये.
3) जाण्याआधी ऑफिस मध्ये जाऊन गस्ती बुकवर सही मारणे आवश्यक असेल. तसेच वापस आल्यानंतर सुद्धा सही मारावी.
4) गस्तीवर जाण्यास अडचण असेल तर किमान दोन दिवसा आधी सांगावे, अथवा वेळेवर माहिती दिल्यास त्याच्या ठिकाणी कुणी जाणार असेल तर तो स्वतः कुणाला तरी तयार करील.
5) गस्तीवर जाण्यास अडचण असल्यास कोणीतरी दुसरा व्यक्ती पाठवावे किंवा ग्रामसभेने पाठविलेल्या व्यक्तीला त्याची त्या दिवशीची रोजी म्हणून 300 रुपये द्यावे लागतील.
6) आज पाळी असून मी काही कारणाने आज न जाता उद्या जाईन असे असल्यास तसे वेळेवर सांगता येणार नाही किंवा पाळीवर सोबत असणाऱ्यांना काही अडचण नसल्यास आपसात ठरवावे.
7) पाळीवर 2 व्यक्तीपेक्षा कमी जाता येणार नाही.
8) गस्तीवर असतांना जर कुणाला कोणत्याही प्रकारची हानी पोहचल्यास तुरंत सर्वांनी मिळून त्याला घरापर्यंत पोहचवावे. आणि वेळ बाकी असल्यास बाकीचे पुन्हा परत जावे.

**(B) चराईचे नियम :**

1) रोज रोज एकाच ठिकाणी चराई करण्यासाठी नेता येणार नाही
2) देवराई/पेनगेडा ठेवलेल्या जंगलात गुरे चारण्यास मनाई.
3) बाहेर गावातील लोकांना आपल्या हद्दीत गुरे चारू देण्यासाठी अगोदर पास काढणे आवश्यक आहे.
4) शेळ्याना चारा म्हणून कोणत्याही झाडाचे फांद्या तोडता येणार नाही.

**(C) गौणवनोपज गोळा, विक्री आणि वापराचे नियम :**

1)गावातील लोकांना निस्तार आणायचे असल्यास जगंलाती वाळलेले लाकूड आणावे.
2) ओले लाकूड तोडता येणार नाही.
3) जंगलातून गरजेपेक्षा जास्त निस्तार आणल्यास तो जप्त केले जाईल आणि तोच निस्तार दुसऱ्या गरजू व्यक्तीला दिले जाईल.
4) कोणाला लग्नासाठी वगैरे वनोपज जास्ती प्रमाणात लागत असल्यास तसे आधीच ग्रामसभेला कळवण्यात यावे.
5)ग्रामसभेला विचारल्या जगंलातून निस्तार आणू शकत नाही.

6) शिवरासाठी लाकूड तोडत असतांना आधी निस्तार बुकात संख्यांची नोंद करावी. व जेवढे लागतात तेवढेच तोडावे वाया जाऊ देऊ नये.
7) वासते आणतांना मोठे झालेले वासते आणू नये. असे आढळल्यास दंडात्मक कार्यवाही होईल.

**(D) बाहेरील व्यक्तीसाठी नियम :**

1) ग्रामसभेतून पास काढल्याशिवाय जंगलातून काहीही नेता येणार नाही.
2) तेंदू सारखे वनोपज न्यायचे असल्यास ते तोडून आमच्या ग्रामसभेतच त्याची विक्री करावी लागेल.
3) मोह फुल गोळा करत असताना त्या झाडाखाली आग लावता येणार नाही
4) बाहेरील व्यक्ती पास घेऊन सुद्धा असेल तरी त्याला माचीस घेऊन जंगलात जाता येणार नाही.
5) जंगलात आल्यानंतर पास असूनही कोणतीही वनस्पती व्यर्थ तोडल्यास दंडात्मक कार्यवाही होईल.

**(E) पेनागेडा असल्यास त्या संबंधी नियम :**

**पेनगेडा नाही.**

**(F) इतर ग्रामसभाशी संबंध ;**

गावाजवळ असलेले सर्व ग्रामसभा एकत्र मिळून तेंदू लिलावसारख्या प्रक्रियेत सहभाग घेतात. एखाद्या गावाला काही अडचण किंवा फसवणूक झाल्यास ते आधी आपल्या जवळच्या ग्रामसभाशी चर्चा करून नंतर महासंघमध्ये विषय मांडतात.

**(G) बँक खाते संबंधी नियम :**

1) कोणालाही पैशाची देवाण घेवाण करत असताना त्याची पावती देने आणि घेणे बंधनकारक राहील.
2) झालेल्या खर्चाचा तपशील दर महिन्याच्या 1 तारखेला दाखविणे बंधनकारक राहील.
3) आर्थिक व्यवहार शक्य तो ऑनलाइन पद्धतीनेच करावा.
4) कोणतीही मोठी रक्कम देवाण घेवाण करायची असल्यास त्याआधी ग्रामसभेची परवानगी घेणे आवश्यक असेल.
5) ग्रामसभेचे पैसे कुंत्याही व्यक्तीला व्यक्तिगत देता येणार नाही.

**(H) आर्थिक व्यवहाराचे हिशोब ठेवण्याचे नियम :**

1) दर महिन्याच्या 1 तारखेला झालेल्या खर्चाचा तपशील ग्रामसभेपुढे मांडावे.
2) हिशोब मागाची जबाबदारी ही गावातील प्रत्येक व्यक्तीची असेल.
3) कुणाला हिशोबामध्ये काही घोळ वाटत असेल तर तसे सरळ ग्रामसभेमध्ये मांडावे.
4) हिशोब मागत असताना कोणत्याही वेळी किंवा कुठेही हिशोब मागता येणार नाही फक्त ग्रामसभेत किंवा हिशोबाच्या दिवशीच मागता येईल.

**(I) लेखापरीक्षण अथवा ऑडीट बाबत नियम:**

1) कोणत्या ठिकाणी किती कर बसते आहे. मग त्या वस्तूची गरज आपल्याला आहे किंवा नाही यावर विचार करावे.
2) जे काही कर असेल ते नियमानुसार भरावे.

# 5 शासकीय योजना

| Sl. No. | Works | Master tategory | NRM/Non NRM | NRM subcategories | Agri & Allied | Water Related | Water Sub-categories |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | व्यक्तींसाठी पीएमएवाय-जी हाऊस बिल्डिंगचे बांधकाम | B | Non-NRM | | | | |
| 2 | व्यक्तींसाठी राज्य योजना घरे बांधणे | B | Non-NRM | | | | |
| 3 | समाजासाठी अंगणवाडी इमारत बांधणे | D | Non-NRM | | | | |
| 4 | समाजासाठी ग्रामपंचायत पंचायत भवन इमारत बांधकाम | D | Non-NRM | | | | |
| 5 | समुदायासाठी अन्नधान्य साठवण इमारतीचे बांधकाम | D | Non-NRM | | Agri/Allied | | |
| 6 | समुदायासाठी किचन शेड इमारत बांधकाम | D | Non-NRM | | | | |
| 7 | समाजासाठी भारत निर्माण सेवा केंद्र इमारत बांधणे | D | Non-NRM | | | | |
| 8 | समाजासाठी अंगणवाडी इमारतीची दुरुस्ती व देखभाल | D | Non-NRM | | | | |
| 9 | समाजासाठी ग्रामपंचायत / पंचायत भवन इमारतीची दुरुस्ती व देखभाल | D | Non-NRM | | | | |
| 10 | समुदायासाठी धान्य साठवण इमारतीची दुरुस्ती व देखभाल | D | Non-NRM | | Agri / Allied | | |
| 11 | समुदायासाठी किचन शेड इमारतीची दुरुस्ती व देखभाल | C | Non-NRM | | | | |
| 12 | समुदायासाठी भारत निर्माण सेवा केंद्र इमारतीची दुरुस्ती व देखभाल | D | Non-NRM | | | | |
| 13 | गटांसाठी कृषी उत्पन्न साठवण इमारत बांधकाम | C | Non-NRM | | Agri / Allied | | |
| 14 | गटांसाठी बचत गट / फेडरेशन बिल्डिंगचे बांधकाम | D | Non-NRM | | | | |
| 15 | व्यक्तींसाठी मातीचे परिघ / शेती / फील्ड बंधांचे बांधकाम | A | NRM | SWC | Agri /Allied | | |
| 16 | व्यक्तींसाठी पेबल पॅरीफेरल / फार्म / फील्ड बॉँडचे बांधकाम | A | NRM | SWC | Agri /Allied | | |
| 17 | व्यक्तींसाठी स्टोन पेरिफेरी / शेती / फील्ड बंधारे बांधणे | A | NRM | SWC | Agri /Allied | | |
| 18 | व्यक्तींसाठी मातीच्या समोच्च बंधाराचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 19 | व्यक्तींसाठी पेबल कॉन्टूर बांधाचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 20 | व्यक्तींसाठी स्टोन समोच्च बंधाराचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 21 | व्यक्तींसाठी मातीच्या दर्जाचे बंध बांधणे | A | NRM | SWC | | | |
| 22 | व्यक्तींसाठी पेबल ग्रेड केलेले बंध बांधणे | A | NRM | SWC | | | |
| 23 | व्यक्तींसाठी स्टोन ग्रेड्ड बांडचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 24 | समुदायासाठी मातीचे परिघ / शेती / फील्ड बंध बांधणे | A | NRM | SWC | Agri /Allied | | |
| 25 | समुदायासाठी पेबल परिघीय / शेत / फील्ड बॉँडचे बांधकाम | A | NRM | SWC | Agri /Allied | | |
| 26 | समुदायासाठी दगड परिघीय / शेत / फील्ड बॉँडचे बांधकाम | A | NRM | SWC | Agri /Allied | | |
| 27 | समुदायासाठी मातीच्या समोच्च बंधाराचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 28 | समुदायासाठी पेबल कॉन्टूर बांडचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 29 | समुदायासाठी स्टोन समोच्च बंधाराचे बांधकाम | A | NRM | SWC | | | |
| 30 | समुदायासाठी मातीच्या दर्जाचे बंध बांधणे | A | NRM | SWC | | | |
| 31 | समुदायासाठी पेबल ग्रेड केलेले बंध बांधणे | A | NRM | SWC | | | |
| 32 | समुदायासाठी स्टोन ग्रेडड बंध बांधणे | A | NRM | SWC | | | |
| 33 | समुदायासाठी मातीच्या ग्रेड बंधची दुरुस्ती व देखभाल | D | NRM | SWC | | | |
| 34 | समुदायासाठी पेबल ग्रेड बंधची दुरुस्ती व देखभाल | D | NRM | SWC | | | |
| 35 | समुदायासाठी स्टोन ग्रेड बंधची दुरुस्ती व देखभाल | D | NRM | SWC | | | |
| 36 | समुदायासाठी फीडर कालव्याचे बांधकाम | A | NRM | Irr | Agri/ Allied | Water | Irr |
| 37 | समुदायासाठी वितरक कालवा बांधणे | A | NRM | Irr | Agri/ Allied | Water | Irr |
| 38 | समुदायासाठी किरकोळ कालवा बांधणे | A | NRM | Irr | Agri/ Allied | Water | Irr |
| 39 | समुदायासाठी उप-गौण कालवा बांधणे | A | NRM | Irr | Agri/ Allied | Water | Irr |
| 40 | समुदायासाठी वॉटरकोर्स/जलमार्ग बांधणे | B | NRM | Irr | Agri/ Allied | Water | Irr |
| 41 | समुदायासाठी फीडर कालव्याचे अस्तरीकरण | A | NRM | Irr | Agri/ Allied | Water | Irr |

